अपंग व्यक्तींच्या स्वयंरोजगारासाठी
बीज भांडवल योजना....

महाराष्ट्र शासन
समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग
मंत्रालय, मुंबई 32.

शासन निर्णय – क्र. इडीडी– 1087 / 28863 / 158 / सुधार 2 दिनांक 19 जानेवारी 1989.

वाचा – शासन निर्णय समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्रमांक इडीडी 1087 / 28863 / 158 / सुधार 2 दिनांक 5 जानेवारी 1989.

शासन निर्णय – दिनांक 5 जानेवारी 1989 च्या समक्रमांकांच्या निर्णयामध्ये अंशतः बदल करून खालीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत --

1. ही योजना जिल्हा उद्योग केंद्र व जिल्हा समाज कल्याण अधिकीर यांच्यामार्फत राबविण्यात यावी.
2. या योजनेखाली बीजभांडवल मिळण्याकरिता अपंगांना जिल्हा समाज कल्याण अधिकारी व जिल्हा उद्योग केंद्रांनी सर्वतोपरी सहाय्य करावे. त्यांनी आपापल्या जिल्हयातील अपंगांचे प्रस्ताव एकत्र करून ते जिल्हा समाज कल्याण अधिका–यांनी त्यांच्या शिफारशीसह त्या जिल्हयातील संबंधित बँकाकडे पाठवावेत.
3. जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांनी संबंधित बँकांचे अधिकारी व जिल्हा उद्योग केंद्र प्रमुखांशी विचार विनिमय करून अपंगांचे प्रस्ताव शक्य तितक्या लवकर मंजूर करावेत. त्यासाठी वरील तिन्ही अधिकाऱ्यांची आवश्यकता भासल्यास बैठक बोलावून अपंगांच्या प्रस्तावाबाबत विचार विनिमय करून प्रस्ताव मंजूरीबाबत त्वरित कार्यवाही करावी.
4. संचालक, समाज कल्याण, पुणे यांनी या योजनेसाठी लागणारा निधी जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांच्याकडे उपलब्ध करून द्यावा व प्रत्येक जिल्हयात उददीष्टे ठरवून द्यावे.
5. विभागीय समाज कल्याण अधिकारी यांच्या विभागाची उददीष्टे पुर्ण करण्यास जबाबदार रहातील व ते योजनेचे मार्गदर्शक तथा पर्यवेक्षक अधिकारी म्हणून काम पाहतील.
6. अपंगांच्या मंजूर प्रकल्पांच्या एकूण खर्चापैकी 20 टक्के रक्कम अनुदान बीजभांडवल म्हणून जिल्हा समाज कल्याण अधिकारी मंजूर करतील व ती रक्कम संबंधित बँकांना मंजूर केलेल्या प्रस्तावानुसार बँकांकडे जमा करतील. बीजभांडवल अनुदान व बँक कर्जाची एकत्रित रक्कम बँकेमार्फत उपलब्ध केली जावी. या योजनेसाठी समाज कल्याण अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी असतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

ग.ह. कांबळे
सहायक सचिव.

GR-20020916164000000-1500